लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचेकडील सुनावणीचे वेळी प्रकरणाविषयी साधंत माहिती देण्याबाबत.

संगणक सांकेतांक-२०१७०५०३१२२२४२६८०७

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
परिपत्रक क्रमांक एलपीएल-१०९७/प्र. क्र. १३४/९७/१५,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ८ जानेवारी १९९८.

वाचा : १] शासन परिपत्रक, सा. प्र. वि. क्र. एलपीएल-१५२५/प्र. क्र. ९०/९५/ पंधरा, दि. २६/१०/९७

२] शासन परिपत्रक, सा. प्र. वि. क्र. एलपीएल-१५९५/प्र. क्र. ९०/९५/ पंधरा, दि. १५/३/९७.

परिपत्रक :-

महाराष्ट्र लोक आयुक्त व उप लोक आयुक्त अधिनियम १९७१ अन्वये लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांच्या कामकाजाला विधीमंडळाच्या कामकाजास ज्याप्रमाणे प्राधान्य दिले जाते त्याप्रमाणे अग्रक्रम द्यावा, मा. लोकआयुक्त व उप लोक आयुक्त यांनी केलेल्या शिफारशींवर सत्वर कार्यवाही करुन तत्संबंधीचा अनुपालन अहवाल त्या कार्यालयास तात्काळ पाठवावा तसेच लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचेकडे सुनावणीस जाताना अधिकाऱ्यास प्रकरणाची सांगोपांग माहिती असावी या व अशा प्रकारच्या इतर सूचना शासनाने यापूर्वी वेळोवेळी दिलेल्या आहेत. याचा पुनरुच्चार संदर्भित परिपत्रकात केलेला आहे.

२. उपरोक्त परिपत्रकान्वये सूचना करुनही या सूचनांचे अनुपालन केले जात नाही असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. अलिकडेच मा. लोक आयुक्त यांचेकडे एका प्रकरणी सुनावणीस गेलेले अधिकारी लोकायुक्तांच्या प्रश्नांना समाधानकारक उत्तरे देऊ शकले नाहीत. मा. लोकआयुक्त यांनी नाराजी व्यक्त करुन संबंधित अधिकाऱ्यांना प्रवास भत्ता आणि दैनिक भत्ता देऊ नये अशी शासनाने शिफारस केली आहे. शासनाच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांबाबत अशी परिस्थिती निर्माण होणे हे उचितच योग्य नाही. हे टाळण्याकरीता मा. लोक आयुक्त व मा. उप लोक आयुक्त यांचेकडे सुनावणीस जाताना अधिकाऱ्यांनी प्रकरणाची सांगोपांग माहिती करुन घ्यावी आणि नंतरच सुनावणीस उपस्थित राहावे अशा सूचना पुन्हा एकवार या परिपत्रकान्वये देण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(मीरा डफळापूरकर)
शासनाच्या उपसचिव.

प्रति,

मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुंबई,
मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मुंबई.
शासनाचे मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/सर्व प्रधान सचिव/सर्व सचिव
प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभागप्रमुख/कार्यालय प्रमुख
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती.